**सन २००९-१० च्या टंचाई कालावधीसाठी कंधार शहर नगरपालिकेच्या (जिल्हा नांदेड) तातडीच्या पाणी पुरवठा योजनेस प्रशासकीय मान्यता ...**

**महाराष्ट्र शासन,**
**पाणी पुरवठा व स्वच्छता विभाग,**
**शासन निर्णय क्र. टंचाई २४१०/प्र.क्र. १२ /पापु १४**
**मंत्रालय, मुंबई ४०० ०३२.**
**दिनांक :- ०३ फेब्रुवारी, २०१०**

**संदर्भ :-** १.शासन निर्णय पाणी पुरवठा व स्वच्छता विभाग क्र. टंचाई २०९९/प्र.क्र.१४/पापु १४, दि.२ फेब्रुवारी १९९९.
२. विभागीय आयुक्त, औरंगाबाद विभाग, औरंगाबाद यांचे पत्र क्र. २००९/मशाका/ क.२ /टंचाई/ प्रमा/ प्रक्र.१/२०१०, दि.१.१.२०१०.
३. जिल्हाधिकारी,जिल्हाधिकारी कार्यालय, नांदेड यांचे पत्र क्र. २००९/मशाका-२/टे- ६८/पार्ट/ सिआर, दि.३१.१२.२००९.
४. शासन पत्र क्र.टंचाई २००९/सं.क्र.२४०३/पापु १४, दि.१२.११.२००९

**प्रस्तावना :-**

सन २०१० च्या टंचाई कालावधीत कंधार ानगरपालिका (जिल्हा नांदेड) क्षेत्रात निर्माण झालेल्या पिण्याच्या पाणी टंचाई निवारणार्थ संदर्भ क्र.२ येथील पत्रान्वये विभागीय आयुक्त, औरंगाबाद यांनी कंधार (जि. नांदेड) शहरातील पानशेवडी तलाव ते कंधार पाणी पुरवठा पंप हाऊस येथपर्यंत पी.व्ही.सी. पाईपलाईन (जलवाहिनी) टाकणे व इलेक्ट्रिक पंप बसविणे इ.कामांचा समावेश असलेला रु. ७३.८४ लक्ष किंमतीचा तातडीच्या पाणी पुरवठा योजनेचा प्रस्ताव शासनास सादर केला आहे. सदर प्रस्ताव विहित आर्थिक निकषात बसत नसल्यामुळे शासन स्तरावर विशेष बाब म्हणून मंजूरीसाठी सादर करण्यात आला आहे.

सचिव स्तरीय स्थायी समितीच्या दि. २८ जानेवारी, २०१० रोजी झालेल्या बैठकीत सदर प्रस्ताव प्रशासकीय मान्यतेसाठी विचारात घेण्यात आला.

**शासन निर्णय -**

प्रस्तावनेत नमुद केल्याप्रमाणे, कंधार शहराच्या तीव्र पाणी टंचाई निवारणार्थ कंधार (जि. नांदेड) शहरातील पानशेवडी तलाव ते कंधार पाणी पुरवठा पंप हाऊस येथपर्यंत पी.व्ही.सी. पाईपलाईन (जलवाहिनी) टाकणे व इलेक्ट्रिक पंप बसविणे इत्यादी कामांचा समावेश असलेल्या **रु. ७३.८४ लक्ष (रुपये त्र्याहत्तर लक्ष चौ-यांशी हजार फक्त) ढोबळ किंमतीच्या कामांना** पुढील अटींच्या अधीन राहून या आदेशान्वये तातडीच्या पाणी पुरवठा योजनेअंतर्गत **विशेष बाब म्हणून प्रशासकीय मान्यता देण्यात येत आहे.**

१) या योजनेसाठी शासनाकडून एकूण खर्चाच्या ९० टक्के म्हणजेच रु. ७०.१५ लक्ष इतके अनुदान उपलब्ध करून देण्यात येईल. तर उर्वरित ५ टक्के म्हणजेच रु. ३.६९ लक्ष इतकी रक्कम कंधार नगर पालिकेने लोकवर्गणीच्या रुपाने भरावी.

२) योजनेसाठी पानशिवडी तलावात पाणी आरक्षित ठेवण्यासाठी जिल्हाधिकारी व जलसंपदा विभागची परवानगी असावी.

३) नगरपालिकेने पाणीपट्टीच्या वसुलीत वाढ करावी.

४) तात्पुरत्या पूरक नळ योजनेची पाईपलाईन वन विभागाच्या हद्दीतून जात असेल तर वन विभागाची परवानगी घेतल्याशिवाय कामास सुरवात करु नये.

५) योजनेचे काम तातडीने व गुणवत्तापूर्णरितीने करण्यात यावे.

६) या योजनेच्या देखभाल व दुरुस्ती व व्यवस्थापनाची जबाबदारी कंधार नगरपालिकेची राहील.

२. या योजनेसाठी अनुदान उपलब्ध करून देण्याचे आदेश स्वतंत्रपणे निर्गमित करण्यात येतील.

३. हा शासन निर्णय दि.२७ नोव्हेंबर २००२ च्या शासन निर्णय क्र.टंचाई २००२/प्र.क्र.३४५/पापु १४ अन्वये पिण्याच्या पाण्याच्या टंचाई निवारणार्थ नागरी व ग्रामीण क्षेत्रातील विहित आर्थिक व भौतिक निकषाबाहेरील तातडीच्या पाणी पुरवठा योजनांना/उपाययोजनांना प्रशासकीय मंजूरी देण्यासाठी स्थापन करण्यात आलेल्या सचिव स्तरीय स्थायी समितीच्या दि. २८ जानेवारी, २०१० रोजी झालेल्या बैठकीत घेण्यात आलेल्या निर्णयानुसार निर्गमित करण्यात येत आहे.

४. सदर शासन निर्णय शासनाच्या **www. maharashtra.gov.in** या वेबसाईटवर उपलब्ध करण्यात आला असून त्याचा **संगणक संकेतांक २०१० ०२०३ १८०३ २५००१** असा आहे.

**महाराष्ट्राचे राज्यपाल यांच्या आदेशानुसार व नावांने.**

**सही /-**
**( सु. वि. कोळेकर)**
**उप सचिव,महाराष्ट्र शासन.**

प्रत,
१. महालेखाकार, (लेखा व परिक्षा /लेखा व अनुज्ञेयता) महाराष्ट्र-१, मुंबई.
२. महालेखाकार, (लेखा व परिक्षा /लेखा व अनुज्ञेयता) महाराष्ट्र-२, नागपूर.
३. वित्त विभाग, मंत्रालय, मुंबई.
४. प्रधान सचिव (२), नगर विकास विभाग, मंत्रालय, मुंबई
५. प्रधान सचिव (ग्रा.वि.), ग्राम विकास व जलसंधारण विभाग, मंत्रालय, मुंबई.
६. प्रधान सचिव, (म.व पु.) महसूल व वन विभाग, मंत्रालय, मुंबई.
७. सदस्य सचिव, महाराष्ट्र जीवन प्राधिकरण, मुंबई
८. विभागीय आयुक्त, औरंगाबाद
९. जिल्हाधिकारी, नांदेड.
१०. मुख्य अधिकारी, कंधार नगरपालिका, जि नांदेड.
११. मुख्य अभियंता, महाराष्ट्र जीवन प्राधिकरण मंडळ, औरंगाबाद.
१२. जिल्हा पाणी पुरवठा अधिकारी तथा अधिक्षक अभियंता, नांदेड.
१३. कार्यकारी अभियंता, महाराष्ट्र जीवन प्राधिकरण, बांधकाम विभाग, नांदेड.
१४. पापु-१४ संग्रहासाठी